पोलीस स्टेशन, हिंगणा अंतर्गत पो.चौ. गुमगांव येथे पोलीस कर्मचारी ०४ - निवासस्थाने बांधणेबाबत. पोलीस अधीक्षक, नागपूर ग्रामीण.

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पोप्रमा-१०१६/प्र.क्र.६८७ /पोल-७**

२रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०००३२

दिनांक ३० नोव्हेंबर, २०१६

वाचा:-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पोमंस/२७-बी/ २८बी-२/ नागपूर ग्रा-पो.ठा. गुमगांव-निवा.बांध./२३०/२०११, दिनांक २६.०२.२०१६

**शासन निर्णय:-**

पोलीस स्टेशन, हिंगणा जिल्हा नागपूर अंतर्गत पो.चौ. गुमगाव येथे पोलीस कर्मचारी ०४-निवासस्थाने बांधकामासाठी संदर्भाधीन पत्राव्दारे सादर केलेल्या प्रस्तावानुसार खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या खर्चाच्या अंदाजपत्रकास, खालील अटीच्या अधीन राहून याव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर कामासाठी निधी उपलब्ध झाल्याशिवाय प्रत्यक्ष बांधकामास सुरुवात करु नये.

२) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

३) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही- २०१३/प्र.क्र.१७७/तां.क. दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

| अ.क्र. | ठिकाण | रक्कम |
|---|---|---|
| १ | पोलीस स्टेशन, हिंगणा अंतर्गत पो.चौ. गुमगांव येथे पोलीस कर्मचारी ०४-निवासस्थाने बांधणेबाबत.<br>पोलीस अधीक्षक, नागपूर ग्रामीण | रु.१६४,८८,३२२ /- (अक्षरी रुपये एक कोटी चौसष्ट लक्ष अठ्ठ्याऐंशी हजार तीनशे बावीस फक्त) |

२. सदर बांधकामाचा निधी मागणी क्र. बी-१० मुख्यलेखाशीर्ष, ४०७०, इतर प्रशासकीय सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८०० इतर खर्च (००) (०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे (४०७० ०१५१) (योजनांतर्गत), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो चालु वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः- विअप्र - २०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप-विभाग-पाच "महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका" अंतर्गत अनुक्रमांक-१,परिच्छेद क्र.१३४ प्रमाणे प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२०१७३२४२३५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2016.12.20 17:37:37 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
४) पोलीस अधीक्षक, नागपूर ग्रामीण.
५) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
८) कार्यासन (इमारती-२/अर्थ-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन (व्यय-७/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती (पोल-७), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.